आदर्श गाव विकास कार्यक्रम
सन २००९-२०१० मध्ये निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्र. आगास२०१०/प्र. क्र. १४/जल-८**
**मंत्रालय , मुंबई -४०००३२**
**दिनांक : ३० मार्च,२०१०.**

वाचा : (१) शासन निर्णय क्रमांक : आगास २०००/प्र.क्र.१/जल-२०, दिनांक १० एप्रिल,२०००.
(२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक :असक -२००९/प्र.क्र.१८/ जल- ११, दिनांक १७.४.२००८
(३) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.अंदाज १०.०९/प्र.क्र.९०/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक ३१.३.२००८.
(४) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक :आगास -२००८/प्र.क्र.७/ जल- ८, दिनांक १३ मार्च.२००८.
(५) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक :आगास -२००९/प्र.क्र.२३/ जल- ८, दिनांक ७ मे,२००९
(६) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र. आगास२००९/प्र. क्र. २३/जल-८, दिनांक : ५ नोव्हेंबर,२००९.
(७) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.आगास २००९/प्र.क्र.५५/जल-८, दिनांक १० फेब्रुवारी,२०१०.
(८) संचालक (मृदसंधारण) तथा सदस्य सचिव, आदर्श गांव संकल्प व प्रकल्प योजना यांचे पत्र क्र.आगास/निधी/१५३/२०१०, दिनांक २३ फेब्रुवारी,२०१०

प्रस्तावना :

आदर्श गांव संकल्प व प्रकल्प योजना लोकसहभागातून ग्राम विकास या संकल्पनेवर आधारीत आहे. गावाच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने शासनाच्या विविध योजना या गावामध्ये राबविण्यात येतात. या योजनेअंतर्गत २०१ गावांची निवड करण्यात आली असून सदर गावाच्या विकासासाठी जलसंधारण/पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत प्रामुख्याने बांधावरील वृक्ष लागवड, सलग समतल चर, दगडाचे बांध, लहान मातीचे बांध, फांद्यांचे बांध, लहान काटयाचे बांध, माती नालाबांध, सिमेंट नालाबांध आणि जमिनीचे सपाटीकरण (भातखाचरे) या कामांचा समावेश आहे. आदर्श गांव योजनेच्या अंमलबजावणी व सनियंत्रणासाठी शासन निर्णय क्रमांक : आगास २०००/प्र.क्र.१/जल-२० दिनांक १० एप्रिल, २००० अन्वये राज्य स्तरीय समिती गठीत करण्यात आलेली आहे. संदर्भाधिन दिनांक १३ मार्च,२००८ च्या शासन निर्णयान्वये सदर समितीची मुदत शासनाचे पुढील आदेश होई पर्यंत वाढविण्यात आली आहे.

... २

२. आदर्श गाव विकास योजनेअंतर्गत सन २००९-२०१० करीता रु.२०.०० कोटी (रुपये वीस कोटी) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. या आर्थिक वर्षात आदर्श गांव प्रकल्प व संकल्प समितीच्या कार्यालयीन दैनंदिन कामकामाजासाठी संदर्भाधिन दिनांक ७ मे,२००९ च्या शासन निर्णयान्वये रुपये १०.०० लक्ष, तसेच आदर्श गांव विकास कार्यक्रमात समाविष्ट असलेल्या गावाच्या विकासाकरीता संदर्भाधिन दिनांक ५ नोव्हेंबर,२००९ च्या शासन निर्णयान्वये रुपये ५३,४३,५८१/- इतका निधी व संदर्भाधिन दिनांक १० फेब्रुवारी,२०१० अन्वये आदर्श गांव समितीच्या कार्यालयाच्या नुतनीकरणाकरीता रुपये ३०.०० लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आदर्श गांव विकास कार्यक्रमांतर्गत समाविष्ठ असलेल्या गावांच्या विकासाकरीता उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आदर्श गांव विकास कार्यक्रमांतर्गत एकूण २०१ गावांचा समावेश आहे. या गावापैकी ५० टक्क्यापेक्षा जास्त भौतिक प्रगती साध्य केलेल्या सुमारे ५८ गावांचे प्रकल्प आराखडे सुधारीत मापदंडानुसार अद्ययावत करण्याची कार्यवाही प्रगती पथावर आहे. या गावांपैकी ६ गावांकरीता संदर्भाधिन दिनांक ५ नोव्हेंबर,२००९ च्या शासन निर्णयान्वये रुपये ५३,४३,५८१/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

२. आदर्श गांव योजनेत असलेले उर्वरीत प्राधान्यक्रम असलेल्या जुन्या निवडलेल्या गावांचा आढावा घेणे , गावे व निवडलेल्या संस्था यांचा समन्वय साधून अंमलबजावणीची संख्या गतीमान करणेबाबतची कार्यवाही सुरु आहे. आदर्श गांव योजनेतील सर्व प्रगतीशील गावांचे आराखडे सुधारीत करणे, त्यास जिल्हास्तरीय समितीच्या मान्यता, अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता इत्यादीसाठी काही कालावधी लागणार आहे. तसेच आदर्श गांव योजनेमध्ये प्रशिक्षणाचे महत्व लक्षात घेता हिवरे बाजार, ता.जिल्हा अहमदनगर येथे अद्ययावत प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यास देखील शासनाच्या विचाराधीन आहे.

३. आदर्श गाव योजनेत निवडलेल्या उपरोक्त गावांकरीता आराखडयानुसार विविध कामासाठी निधी मंजूर करणे, प्रशिक्षण केंद्र उभारणे, नविन गावे निवडीसाठी विविध स्तरावर बैठका घेणे, जुन्या गावांचे मुल्यमापन करणे इत्यादी सर्व बाबींसाठी **रुपये १९,०६,५६,४१९ (रुपये एकोणीस कोटी सहा लक्ष छपन्न हजार चारशे एकोणीस फक्त)** निधी सन २००९-२०१० मध्ये वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त मंजूर केलेला **रुपये १९,०६,५६,४१९ (रुपये एकोणीस कोटी सहा लक्ष छपन्न हजार चारशे एकोणीस फक्त)** निधी खर्च करण्यासाठी आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे तो त्याच प्रयोजनाकरिता खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी. **हा निधी वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा,पुणे या स्वायत्त संस्थेच्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.**

५. याबाबतचा खर्च सन २००९-२०१० च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा आणि " मागणी क्र. एल-७, ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च, १०२ मृदसंधारण, १०२ (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, १०२ (०१) (१५) आदर्श गांव विकास कार्यक्रम (४४०२१०८६),५३ मोठी बांधकामे " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

...३

६. आदर्श गाव योजनेकरिता संदर्भाधिन दिनांक ७ मे,२००९, दिनांक ५ नोव्हेंबर,२००९ व दिनांक १० फेब्रुवारी,२०१० च्या शासन निर्णयान्वये वितरित केलेला रुपये ९३,४३,५८१/- व आता या शासन निर्णयान्वये वितरित केलेला रुपये १९,०६,५६,४१९/- असा एकूण २०.०० कोटी निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.१०४/१०/व्यय-१५, दिनांक २९ मार्च,२०१० अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३३०१९४५३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रेखा भिडे)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा.मंत्री (जलसंधारण).
मा.राज्यमंत्री (जलसंधारण).
मा.मुख्यसचिव यांचे सचिव.
आयुक्त,कृषि, महाराष्ट्र राज्य,पुणे (३ प्रती).
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
कृषि उपसंचालक, ,आदर्श गांव संकल्प व प्रकल्प समिती,पुणे (५ प्रती)
महालेखापाल, महाराष्ट्र १/२,(लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर (३ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी / निवासी लेखापरीक्षा,मुंबई (३ प्रती)
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा,पुणे.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
कार्याध्यक्ष,आदर्श गांव संकल्प व प्रकल्प समिती,पुणे
सर्व सहसचिव/उपसचिव, जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
कक्ष अधिकारी, जल-११, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
निवडनस्ती, का. जल-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.